**प्रादेशिक मनोरुग्णालय,येरवडा, पुणे येथे सर्व्हे नं.२७ व १५९ या मोकळया भूखंडाची संरक्षक भिंत बांधणेच्या कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१५/प्रक्र-२५६/आरोग्य ३(अ)**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, ए विंग, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: ११ सप्टेंबर,२०१५.

**वाचा :-**

अति.संचालक, ( आरोग्य संस्थामार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम ) आरोग्य सेवा , मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/ माआ/ टे-१/ न.क्र. ४७३ /७८६-८८/ २०१५. दि. १७ /०६ /२०१५.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन पत्रान्वये प्रादेशिक मनोरुग्णालय ,येरवडा पुणे येथील सर्व्हे नं २७ व १५९ या मोकळया भूखंडावर संरक्षक भिंत बांधण्याकरिता, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्या कडून प्राप्त झालेले रु.१,७८,०८,५०७/- (अक्षरी रुपये एक कोटी अठयाहत्तर लक्ष आठ हजार पाचशे सात फक्त) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक व आराखडे आरोग्य सेवा संचालनालयातर्फे सादर करण्यात आले होते . सदर मोकळया भूखंडावर संरक्षक भिंत बाधणेच्या बांधकामासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन रु. १,७२,३८,७५०/-( अक्षरी रुपये एक कोटी बहात्तर लक्ष अडतीस हजार सातशे पन्नास फक्त)इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखडयांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

आता या शासन निर्णयान्वये प्रादेशिक मनोरुग्णालय ,येरवडा पुणे येथील सर्व्हे नं २७ व १५९ या मोकळया भूखंडावर संरक्षक भिंत बांधण्याच्या कामास १,७२,३८,७५०/-( अक्षरी रुपये एक कोटी, बहात्तर लक्ष, अडतीस हजार, सातशे पन्नास फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखडयांना खालील विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे आणि त्याखाली नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहुन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| SR. No | Work Name | Amount |
|---|---|---|
| | Construction of Compound wall for residential Qtrs. S.No.27 & 159 at RMH at Yerwada,Pune-06 | |
| 1 | Work Portion | Rs.1,46,09,111.00 |
| 2 | Add Contingencies Charges 4% | Rs. 5,84,364.00 |
| | Total | **Rs.1,51,93,475.00** |
| 3 | Add Cent age Charges 4% | Rs. 5,84,364.00 |
| 4 | Add Price Escalation 10% | Rs. 14,60911.00 |
| | Total | **Rs.1,72,38,750/-** |

अ) काम सुरु करण्यापूर्वी संदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित अभियंता व मुख्य अभियंता यांच्याकडून साक्षांकीत करुन घ्यावे..

ब) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

सदर बांधकामावरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

**लेखाशिर्ष**:-

२२१०- वैद्यकीय सेवा. व सार्वजनिक आरोग्य.

०१- नागरी आरोग्य सेवा-विषम चिकीत्सा

११०- रुग्णालये व दवाखाने

११०-०६- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना

राज्य योजनांतर्गत योजना

(०६) (०१)- मध्यवर्ती मनोरुग्णालये

(२२१० ०२९१)

२७- लहान बांधकामे .

हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौप ३३९ / इमा-३ दि. ०२ /०९/ २०१५ अन्वये प्राप्त सहमतीने आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक - विअप्र -१०.०८ / प्र.क्र. ७०/२००८/ विनीयम , दिनांक १५ मे २००९ सोबतच्या परिशीष्ट भाग- पहिला उपविभाग - पाच मधील अनुक्रमांक-१,परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०९१११७२५२२३६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shubha Anil Gadre

Digitally signed by Shubha Anil Gadre
DN: CN = Shubha Anil Gadre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.09.11 18:22:43 +05'30'

**(शु.अ.गद्रे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. संचालक ,आरोग्य सेवा, मुंबई.
२. अति.संचालक, ( आरोग्य संस्थामार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम ) आरोग्य सेवा , मुंबई
३. उपसंचालक , आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.

४. वैद्यकीय अधिक्षक , प्रादेशिक मनोरुग्णालय, येरवडा , पुणे.
५. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम .विभाग, पुणे.
६. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम .विभाग, पुणे.
७. महालेखापाल १/२ महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा )/ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपुर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९. अवर सचिव (अर्थसंकल्प) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय , मुंबई.
१०. निवडनस्ती.